शालेय पोषण आहार योजनेंर्गत अनुसूचित जाती (SCSP) उपयोजनेच्या निधी वितरणाबाबत (सन २०२१-२२)

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२१/प्र.क्र.१०२/एस.डी.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: २७ जानेवारी, २०२२

**वाचा:-**

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२०

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०

३) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२१-Desk (MDM) दि.२४ मे, २०२१

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोबर, २०२१

६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२०/प्र.क्र.२३/ अर्थसंकल्प(विघयो) दि.१३.०१.२०२२

**प्रस्तावना :-**

शालेय पोषण आहार योजनेंतर्गत केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.२४ मे, २०२१ रोजीच्या आदेशान्वये केंद्र हिस्स्याचा रु.२५८७७.९९ लक्ष इतका तदर्थ निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीची विगतवारी सर्वसाधारण, अनुसूचित जाती उपयोजना (SCSP) व अनुसूचित जमाती उपयोजना (TSP) या घटकांतर्गत केली आहे. केंद्र शासनाने वितरित केलेल्या निधीपैकी अनुसूचित जाती उपयोजना (SCSP) घटकांतर्गतचा केंद्र हिस्स्याचा रु.३५२९.७६ लक्ष निधी व त्यास समरुप राज्य हिस्साचा रु.२३५३.१७ लक्ष असा एकूण रु.५८८२.९३ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास सामाजिक न्याय व व विशेष सहाय्य विभागामार्फत मान्यता देण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. तथापि, अनुसूचित जाती उपयोजनांतर्गत राज्य हिस्स्याच्या लेखाशिर्षामधून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील अवितरीत रक्कम वितरीत केल्यामुळे सद्यस्थितीत सदर लेखाशिर्षामध्ये वितरणाकरीता निधी शिल्लक नसल्यामुळे राज्य हिस्स्याची रक्कम वितरीत केलेली नाही. तसेच, केंद्र हिस्स्याची रक्कम रु.३५२९.७६

लक्ष वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भाधिन दि.१३ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये केंद्र हिस्स्याचा निधी विभागास उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार सदर निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता दि.१३ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने शालेय पोषण आहार योजनेकरीता अनुसूचित जाती उपयोजना लेखाशिर्षातंर्गत उपलब्ध करुन दिलेल्या केंद्र हिस्स्याचा रु.३५२९.७६ लक्ष (रुपये पस्तीस कोटी, एकोणतीस लक्ष, शहात्तर हजार फक्त) इतका निधी खालील लेखाशिर्षामधून वितरीत करण्यास व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी वितरीत केलेली तरतूद | वितरणास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १. | मध्यान्ह भोजन योजना (केंद्र हिस्सा ६०%) (२२०२ ।७६४ ) | रु.६००० लक्ष | रु.१५७४.१२ लक्ष | रु .३५२९.७६ लक्ष |

२. सदरचा शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णय क्र.बीजीटी-२०२०/प्र.क्र.२३/अर्थसंकल्प(विघयो), दि.१३ जानेवारी, २०२२ नुसार तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८८१/व्यय-१४, दि.३० सप्टेंबर, २०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर निधीचा विनियोग वित्त विभागाच्या दि.०६ मे, २०२१, दि.२४ जून, २०२१ तसेच दि.१४ ऑक्टोंबर, २०२१ रोजीच्या परिपत्रकातील सूचनांनुसार तसेच शासनाने वेळोवळी दिलेल्या निर्देशास अनुसरुन करण्यात यावा.

२. केंद्र शासनाचा निधी प्रत्यक्षात जमा झाल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने दि.०३/०६/२०२१ रोजीच्या ई-मेल व्दारे अवगत केले आहे. सदर निधी वित्त विभागाने वेळोवळी देण्यात आलेल्या निर्देशास अनुसरुन खर्च करण्यात यावा.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२७१५२६२७३६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, pseudonym=9D437DB3701DE5FE5D194241FCB9D73DC26031B1, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2022.02.16 12:42:22 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१६) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती - एस.डी. ३.